**सन २०१४-१५ अर्थसंकल्पीय अनुदान**
**मागणी क्र. जे-५, ७६१०, शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे - इतर वाहने (सायकल) खरेदी अग्रिम..**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. इवाअ १४१५/प्र.क्र. ५/का-पाच,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २७ मार्च, २०१५

**संदर्भ- १) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्र. अग्रिम २०१३/प्र. क्र. १०/२०१३, विनियम, दि. २० ऑगस्ट २०१४**

**शासन निर्णय :-**

मागणी क्र. जे-५, मुख्यलेखाशीर्ष ७६१०, शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे, याखालील उपशीर्ष (२०३)(००)(०१) इतर वाहने (सायकल) खरेदी अग्रिमे (७६१० ०४९९) यासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून, खालील विवरणपत्रामधील स्तंभ २ येथील कर्मचारी यांना सायकल खरेदी करण्यासाठी, स्तंभ ५ येथील नमूद नियंत्रक /मंजुरी अधिकारी यांना विवरणपत्रामधील स्तंभ ६ मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण रक्कम रु. ७,०००/- (रुपये सात हजार फक्त) इतका निधी प्रमाणित करण्यास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

| विववरणपत्र | | | | | (आकडे रुपयात) |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र | कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम | नियंत्रक अधिकारी संकेतांक क्र | नियत्रंक/मंजुरी अधिकारी | मंजूर करण्यात आलेले अग्रिम |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. अनिल लालाजी मेश्राम | शिपाई | ८०००८ | प्रमुख न्यायाधीश जिल्हा व सत्र न्यायालय, अमरावती | ३५००/- |
| २ | श्री. धनराज कृष्णराव नरगडे | शिपाई | | | ३५००/- |
| | एकूण रुपये (सात हजार फक्त) | | | | ७०००/- |

२) हा निधी, मुंबई वित्तिय नियम, १९५९ मधील नियम १३६,१३७ व १३९ च्या अधिन राहून तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अग्रिम-२०१३/प्र.क्र. १०/२०१३/विनियम, दि. २०.०८.२०१४ मधील सूचना व विहित नियम/अटींच्या अधीन राहून व सदर शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करून वितरित करण्याची दक्षता मंजुरी अधिकारी/नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

३) मंजुरी अधिकारी / नियंत्रक अधिकारी यांनी उपलेखाशीर्षनिहाय मासिक खर्चाचे नियोजन करुन अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे (BDS) तरतुदीचे वाटप आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना करावे. सदर अनुदानातून केला जाणारा खर्च मासिक निधी विवरणपत्रानुसार संगणकीय अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BDS) त्या त्या महिन्याचा खर्च त्याच महिन्यांमध्ये करण्यात यावा व तो मंजूर तरतुदींच्या मर्यादेत करण्यात यावा.

४) अर्जदार खरेदी करणार असलेल्या सायकलची किंमत प्रमाणित अग्रिमापेक्षा कमी असल्यास शिल्लक रक्कम शासनास ताबडतोब परत केली जाईल, याची काळजी घ्यावी व त्याबाबत शासनास अवगत करण्यात यावे.

५) अर्जदारास त्याच्या नांवासमोर दर्शविलेल्या रकमेइतकेच अग्रिम मंजूर करावे. निर्देशिलेल्या अर्जदाराव्यतिरिक्त दुस-या कोणत्याही अर्जदारास हे अग्रिम देय होणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी.

६) संबंधित कर्मचारी आपल्या कार्यालयातून बदलून दुसरीकडे गेले असल्यास, अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर Authorisation Slip काढण्यापूर्वी, त्याबाबतचा तपशील शासनास कळविण्यात यावा. तदनंतर त्या अनुषंगाने, प्रणालीवर प्राधिकृत करण्यात आलेल्या रकमेमध्ये शासनाकडून आवश्यक ते बदल करण्यात आल्यानंतरच देयक तयार करण्याबाबतची पुढील कार्यवाही संबंधित कार्यालयाने करावी. इतर वाहन (सायकल) खरेदी अग्रिम कर्मचा-यास सेवा कालावधीत एकदाच देय राहील.

७) प्रमाणित केलेल्या रकमेचा विनियोग विहित कालावधीत न झाल्यास प्रमाणित केलेली रक्कम त्वरीत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी. जर काही कारणास्तव सदर अग्रिम मंजूर करण्यात येत नसेल अथवा नाकारण्यात येत असेल तर तसे या विभागास सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून १० दिवसाच्या आत कळविण्यात यावे. अन्यथा याबाबतची संपूर्ण जबाबदारी मंजूरी अधिकारी /संबंधित नियंत्रक अधिका-यांवर राहील, याची कृपया नोंद घेण्यात यावी.

८) प्रत्येक कार्यालयाने उद्दीष्ट निहाय केलेला दर महिन्याचा प्रत्यक्ष खर्च हा महालेखापाल यांच्या लेख्यामध्ये दर्शविण्यात आलेल्या खर्चाशी तंतोतंत जुळण्यासाठी http://agmaha.cag.gov.in या वेबसाईटवर दरमहा मासिक खर्चमेळाचे काम ऑनलाईन करण्यात यावे व पडताळणी केलेल्या खर्चाचे मासिक विवरणपत्र रिकंसिलीएशन कंप्लिशन स्लिपसह प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत या विभागाच्या कार्यासन ५/२४ कडे परस्पर पाठविण्यात यावे.

९) इतर वाहने (सायकल) खरेदी अग्रिम वसूली १० समान मासिक हप्त्यांमध्ये व्याजासह वसूली होईल, अशा प्रकारे वसूलीचे हप्ते निश्चित करण्यात यावेत.

१०) नविन मोटार वाहन, अपंग राज्य शासकीय कर्मचाऱ्यांसाठी स्वयंचलीत तीन चाकी सायकल, स्कूटर, मोपेडचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविण्यात यावा व तो सतत चालू राहील याची दक्षता घेण्यात यावी.

११) अग्रिमासाठी अर्ज करणाऱ्या कर्मचारी यांची शासनाच्या सेवेतील नियुक्ती संबंधित पदाच्या सेवाभरती नियमानुसार करण्यात झाली असावी आणि अशाप्रकारे करण्यात आलेल्या नियुक्तीनंतर कमीत कमी पाच वर्षाची सलग सेवा झाली असावी.

१२) अग्रिम मंजूर केलेल्या कार्यालयीन आदेशाच्या प्रतीसह अर्जदाराने अग्रिम त्याच कारणासाठी वापरल्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागास ताबडतोब पाठविण्यात यावे. तसेच खरेदीखत आणि गहाणखताच्या प्रती संबंधित कर्मचारी यांचेकडून प्राप्त करुन घेऊन मंजूरी प्राधिका-यांनी आपल्या कार्यालयाच्या अभिलेखामध्ये जतन कराव्यात. संबंधित अर्जदारास अग्रीम मंजूरीच्या वेळी याबाबत आवश्यक सुचना देण्यात याव्यात. अन्यथा सदर प्रकरणी शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रीम-१०९५/प्र.क्र.७०/९५/विनियम, दिनांक २६ सप्टेंबर, १९९५ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

१३) हा खर्च "मागणी क्र.जे-५ मुख्यलेखाशीर्ष ७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्जे, याखालील उपशीर्ष (२०३) (००) (०१) इतर वाहने (सायकल) खरेदी अग्रीमे (संकेतांक ७६१० ०४९९) -(योजनेतर/दत्तमत) यासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

१४) इतर वाहने (सायकल) खरेदी अग्रिमाची वसुली ७६१०-शासकीय कर्मचा-यासाठी कर्जे इ. (२०३)(००)(०१)- इतर वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा (७६१० ५०३३) या जमाशीर्षाखाली जमा करावी व त्यावरील व्याज- ००४९ व्याजाच्या जमा रकमा, ८००- इतर जमा रकमा, (०१) (४६) (iii) इतर वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा (००४९ १७४६) या जमाशीर्षाखाली जमा करावी.

१५) सदरहू शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र. अंदाज २०१३/प्र. क्र. ८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दि. २५ एप्रिल २०१३ सोबतच्या परिशिष्टातील अट क्र. ८ मधील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१६) हा शासन निर्णय निधी उपलब्धतेचे प्रमाणपत्र समजण्यात यावे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५०३२७१२२९४१५२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Mansing N Pawar

Digitally signed by Mansing N Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mansing N Pawar
Date: 2015.03.27 12:43:26 +05'30'

**( मा. ना. पवार )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा ) महाराष्ट्र २, नागपूर,
३. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अमरावती.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
५. वित्त विभाग, अर्थसंकल्प (७ व १०) मंत्रालय, मुंबई. ३२
६. कार्यासन -२३ व कार्यासन २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. ३२
७. निवडनस्ती /का.५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. ३२